**कोषागारातील निवृत्ती वेतन प्रदानाच्या कार्यपध्दतीत सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग,
शासन परिपत्रक .- संकीर्ण - १००९ /प्र.क्र. ३१ / कोषा प्रशा ५
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक - २४ जून, २००९

**प्रस्तावना :-** राज्यातील सर्व कोषागार कार्यालयातील निवृत्ती वेतन विभागामार्फत राज्य व केंद्र शासनाच्या निवृत्तीधारकांना दरमहा निवृत्ती वेतन तसेच कुटुंब निवृत्ती वेतन अदा केले जाते. जिल्हा कोषागार कार्यालयामध्ये त्यासाठी "अप्पर कोषागार अधिकारी" (निवृत्ती वेतन) यांच्या नियंत्रणाखाली हा विभाग कार्यरत आहे. सध्याच्या कार्यपध्दतीमध्ये निवृत्ती वेतन विभागामध्ये तयार झालेल्या देयकांसाठी टोकन नोंदवही ठेवण्यात येत नसल्याने देयक काऊंटरला त्या देयकाचा खरेपणा तपासता येत नाही. तसेच काही प्रसंगी देयकाचा शोध घेणे शक्य होत नाही. निवृत्ती वेतन विभागामध्ये तयार करण्यात आलेल्या देयकांची तपासणी (स्क्रोल झाल्यानंतर) निवृत्ती वेतन विभागातच होते. सदर तपासणी अधिक प्रभावी व पारदर्शी पध्दतीने होण्याकरीता इतर देयकांप्रमाणेच निवृत्तीवेतन व तद्संबंधित देयके कोषागारांच्या लेखा परिक्षण शाखांमार्फत होणे आवश्यक आहे.

खोटया / बोगस निवृत्ती वेतन विषयक देयकांना प्रतिबंध करणे, ट्रेझरीनेट प्रणाली व पेन्शन ॲटोमेशन सिस्टीम प्रणालीमध्ये सुसुत्रता व एकजिनसीपणा आणणे. निवृत्ती वेत. विभागातील कामाचे स्वरूप अधिक जबाबदारीपूर्ण व पारदर्शक बनविणे. या सर्व बाबींचा विचार करून कार्यपध्दतीत बदल करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते यासाठी खालीलप्रमाणे सुधारीत कार्यपध्दतीची अंमलबजावणी करण्यात यावी.

**परिपत्रकः-**

**देयके तयार करणे:-**

दरमहा निवृत्ती वेतनाची देयके व सुधारीत वेतन विषयक फरकाची देयके आज्ञावलीद्वारेच तयार करावीत. पेन्शन ऑटोमेशन सिस्टीम (PAS) प्रणालीमधून तयार होणाऱ्या बदल विवरणपत्र (change statement) आधारे तपासणी करून अप्पर कोषागार अधिकारी (नि. वे.) यांनी देयकांवर आहरण व संवितरण अधिकारी म्हणून स्वाक्षरी करावी.

**देयके कोषागारात सादर करणे :-**

प्रदानासाठी कोषागारात देयक सादर करण्यासाठी अप्पर कोषागार अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात यावे. निवृत्ती वेतन विभागातील सर्व देयके टोकन रजिस्टरमध्ये नोंदवून अप्पर कोषागार अधिकारी यांच्या सहीने कोषागारात सादर करण्यात येतील. देयकासोबत BEAMS प्रणालीतून काढलेले प्राधिकार पत्र जोडणे आवश्यक राहील.

**देयकांची तपासणी करणे:-**

अप्पर कोषागार अधिकारी (निवृत्ती वेतन) यांनी सादर केलेली देयके Scroll झाल्यानंतर कोषागार कार्यालयाच्या लेखा परिक्षण शाखेत सादर होतील. लेखा परिक्षण विभागामध्ये देयकाचा खरेपणा, सहीचा नमुना तपासून खात्री करण्यात यावी. देयकातील निवृत्ती वेतन धारकांची माहिती तपासण्यासाठी लेखा परिक्षण विभागाला PAS प्रणालीतील डेटा तपासण्याची सुविधा उपलब्ध करून देण्यात यावी. अप्पर कोषागार अधिकारी (लेखा परिक्षण) निवृत्ती वेतनाची देयके पारीत करण्यास सक्षम प्राधिकारी असेल.

**देयके पारीत झाल्यानंतर:-**

देयके पारीत झाल्यानंतर प्रथम प्रदानाचा इलेक्ट्रॉनिक डेटा दरमहा महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात यावा. इलेक्ट्रॉनिक डेटाद्वारे महालेखापाल कार्यालयास प्राप्त झालेल्या व कोषागारातून प्रदान झालेल्या उपदान व अंशराशीकरण प्राधिकराची सत्यता उपदान प्रदान आदेश (Gratuity Payment Order) व सेवा निवृत्ती वेतन प्रदान आदेश (Pension Payment Order) क्रमांकाद्वारे तपासण्यात येईल.

(कृ. मा. प.

**PAS प्रणालीवरील प्रभावी नियंत्रण ठेवणे:-**

नवीन निवृत्ती वेतन धारकांचा महालेखापालांकडून प्राप्त झालेला इलेक्ट्रॉनिक डेटा व प्रत्यक्ष PPO याची तपासणी अप्पर कोषागार अधिकारी (निवृत्ती वेतन) यांनी करावी. दरमहा बदल विवरणपत्र (change statement) अप्पर कोषागार अधिकारी (निवृत्ती वेतन) यांनीच काढावे व प्रत्यक्ष तपासून त्याआधारे देयकावर स्वाक्षरी करावी. पासवर्ड ठरावीक कालांतराने बदलले जातील याकडे अप्पर कोषागार अधिकारी (निवृत्ती वेतन) यांनी नियंत्रण ठेवावे.

सदर बदलांमुळे निवृत्ती वेतन विभागातून खोटी अथवा बोगस देयके तयार करणे व सादर करणे याची शक्यता कमी होईल. अप्पर कोषागार अधिकारी (निवृत्ती वेतन) यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित केल्यामुळे देयकांचा खरेपणा देयक स्विकृती काउंटरलाच समजू शकेल. PAS मधून तयार होणाऱ्या बदल विवरणपत्र (change Statement) वर अप्पर कोषागार अधिकारी (निवृत्ती वेतन) यांचे प्रभावी नियंत्रण राहील्याने बोगस निवृत्ती वेतन लाभाच्या प्रदानावर प्रभावी आळा बसेल. उपदान प्रदान आदेश / सेवा निवृत्ती वेतन / सुधारीत सेवा निवृत्ती वेतन प्रदान आदेश प्रथम प्रदानाच्या प्राधिकाराची महालेखापाल कार्यालयात छाननी झाल्याने खोटया अथवा बोगस देयकांना प्रतिबंध होईल.

उपरोक्त सुचना / उपाययोजनांचे काटेकोरपणे अंमलबजावणी करून निवृत्ती वेतन धारकांचे/ कुटुंब निवृत्ती वेतन व तत्सम देयके पारीत करण्यात यावीत. उपरोक्त सूचना आदेश निर्गमित झाल्याचे दिनांकापासून अंमलात येतील.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून याचा संगणक संकेतांक २००९०६२४१४०८५४००१ असा आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स. अ. मु. नकवी)
उप सचिव

प्रत:-

१. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३. सर्व उपकोषागार अधिकारी
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई (१० प्रती)
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई (१० प्रती)
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर (१० प्रती)
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, मुंबई (१० प्रती)
८. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे / मुंबई

- - - - -

H. 1041-1 ३१